परिवहन आयुक्त कार्यालयातील साफसाफई कामकाजाच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०१२२/प्र.क्र.१७/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २३ मार्च, २०२३

**वाचा :-**

परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र-पआका/का.१०/रवका/ साफसफाई कंत्राट/०३(०३)/२०२३/जा.क्र.२५१९ दि.२०.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

परिवहन आयुक्त कार्यालयाच्या कार्यालयीन जागेचे साफसफाई कामकाजाचे मे.आधार बेरोजगार सेवा सहकारी संस्था, मुंबई यांना दि.०१.११.२०२२ ते दि. २८.०२.२०२३ या कालावधीची थकित देयके अदा करणेसाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

परिवहन आयुक्त कार्यालयाच्या कार्यालयीन जागेचे साफसफाईचे कामकाज कंत्राटी पध्दतीने करण्यासाठी मे.आधार बेरोजगार सेवा सहकारी संस्था यांचेसोबत सेवा करार करण्यात आला होता. मे.आधार बेरोजगार सेवा सहकारी संस्था, मुंबई यांचे दि.०१.११.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ या कालावधीचे रु.१,९०,२४०/- (अक्षरी रक्कम रु.एक लाख नव्वद हजार दोनशे चाळीस फक्त) इतक्या रकमेची देयके अदा करण्यासाठी या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. "बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर, ००, ००१, संचालन व प्रशासन - ०१, परिवहन आयुक्त (०१)(०१),आस्थापना- परिवहन आयुक्त (दत्तमत्त)(अनिवार्य) १३ कार्यालयीन खर्च २०४१००१८-१३" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२२-२३ या वित्तीय वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग -२, अनुक्रमांक १, नियम क्र.२ व ७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२३१७०८३४५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.03.23 17:13:10 +05'30'

**( भरत लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. जिल्हा कोषाधिकारी, जिल्हा रायगड
६. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती (परि-४).